# महाराष्ट्र शासन

**क्रमांक :**मावज-२००९/प्र.क्र.४५७/०९/३४-अ,
सामान्य प्रशासन विभाग,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
**दिनांक :** ११.१०.२०१०

## आदेश

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील सहायक संचालक (माहिती)/माहिती अधिकारी/अधिपरिक्षक, पुस्तके व प्रकाशने **गट-ब** (वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४४००) संवर्गात कार्यरत असलेल्या खालील अधिकाऱ्यांना वरीष्ठ सहायक संचालक (माहिती)/जिल्हा माहिती अधिकारी/वरिष्ठ उपसंपादक/जनसंपर्क अधिकारी **गट-अ** (कनिष्ठ) ( वेतन बँड ९३००-३४८०० ग्रेड वेतन ४६००) या पदावर पुढील अटींच्या अधीन राहून पदोन्नती/तदर्थ पदोन्नती देण्यात येत असून कामकाजाच्या व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने त्यांची त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव व वर्तमान पदनाम | प्रवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे पद |
|---|---|---|---|
| १ | श्री. संजय स. देशमुख, सहायक संचालक (माहिती), मुंबई | खुला | वरिष्ठ उपसंपादक, मुंबई |
| २ | श्री.श्रा. के. कोरेटी, सहायक संचालक (माहिती), मुंबई | अ.ज. | जिल्हा माहिती अधिकारी, जालना |
| ३ | श्री. न.कि. मेश्राम, सहायक संचालक (माहिती), अमरावती | अ.जा. | जिल्हा माहिती अधिकारी, भंडारा |
| ४ | श्री. सा.ना. पुंड, सहायक संचालक (माहिती), नाशिक | खुला | जिल्हा माहिती अधिकारी, अहमदनगर |
| ५ | श्री. चं.गो. क्षीरसागर, सहायक संचालक (माहिती), नागपूर | खुला | जिल्हा माहिती अधिकारी, गोंदिया |
| ६ | श्री. अ.अ. सुखटणकर, सहायक संचालक (माहिती), कोल्हापूर | खुला | जिल्हा माहिती अधिकारी, सांगली |

वरील अधिका-यांपैकी अनुक्रमांक १ ते ३ येथील अनुक्रमे सर्वश्री देशमुख, कोरेटी व मेश्राम या अधिकाऱ्यांना रिक्त पदावर **पदोन्नती** व अनुक्रमांक ४ ते ६ येथील अनुक्रमे सर्वश्री पुंड, क्षीरसागर व सुखटणकर या अधिकाऱ्यांना प्रतिनियुक्तीवर गेलेल्या अधिकाऱ्यांच्या तात्पुरत्या स्वरुपात रिक्त असलेल्या पदावर **तदर्थ पदोन्नती** देण्यात येत आहे.

१) वरील अधिकाऱ्यांना वरिष्ठ सहायक संचालक (माहिती)/जिल्हा माहिती अधिकारी/वरिष्ठ उपसंपादक/जनसंपर्क अधिकारी गट-अ (कनिष्ठ) पदावरील पदोन्नती त्यांच्या विरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही या धारणेच्या अधिन राहून तसेच मुंबई उच्च न्यायालयात प्रलंबित असलेल्या याचिका क्रमांक ८४५२/२००४ च्या अंतिम निकालाच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

२) अनुक्रमांक ४ ते ६ येथील ३ (तीन) अधिकाऱ्यांना ही तदर्थ पदोन्नती प्रथम ११ महिने अथवा त्या पदावरील प्रतिनियुक्तीने गेलेले संबधीत अधिकारी प्रतिनियुक्तीवरुन परत येईपर्यंत, यापैकी जे अगोदर घडेल, त्या कालावधीपर्यन्त असेल.

३) या आदेशान्वये पदोन्नत होणाऱ्या अधिकाऱ्यांना त्यांच्या पदोन्नत्या नियमित होईपर्यंत ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

हे आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक **२०१०१०११११८५२३३००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(निं. बा. रायलापूरकर)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा व परिक्षा), मुंबई/नागपूर,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती)(प्रशासन),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
संचालक (माहिती)(वृत्त व जनसंपर्क),माहिती व जनसंपर्क महासंचालनालय,मंत्रालय, मुंबई,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
जिल्हा कोषागार अधिकारी, जालना, अहमदनगर, गोंदिया, भंडारा, सांगली,
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
उपसंचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
विभागीय माहिती कार्यालय, नाशिक, नागपूर, अमरावती, कोल्हापूर
जिल्हा माहिती अधिकारी कार्यालय, जालना, अहमदनगर, गोंदिया, भंडारा, सांगली,
संबंधीत अधिकारी, (मावज मार्फत)
सामान्य प्रशासन विभाग/का.१२, १६-ब व ३४,
प्र.स.(मावज) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मंबई,
**निवड नस्ती (का.३४-अ)**